**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांकः प्रतिनि-१२१६/सं.क्र.३४५/प्र.क्र.६७/का.१४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २९ डिसेंबर, २०२१.

**संदर्भ** :- १) सा.प्र.वि. आदेश क्र.उसप्र-१२१६/प्र.क्र.६७/चौदा, दि.०९.०८.२०१६,
दि.०७.०८.२०१७, दि.२७.०८.२०१८, दि.०९.०१.२०२० व दि.१८.११.२०२०.
२) पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, पुणे यांचे पत्र क्र.विप्रा/प्रशासन/प्र.क्र.२२८/१४८४, दि.१८.११.२०२०.

## आदेश

श्रीमती आशाराणी उ.पाटील, अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग यांची संदर्भाधीन दि.०९.०८.२०१६ च्या आदेशान्वये नगर विकास विभागाच्या अधिपत्याखालील पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, आकुर्डी, जि.पुणे या कार्यालयातील “उप मुख्य कार्यकारी अधिकारी” या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. तसेच दि.०७.०८.२०१७, दि.२७.०८.२०१८ व दि.०९.०१.२०२० च्या आदेशान्वये श्रीमती पाटील, अवर सचिव यांच्या प्रतिनियुक्तीस दि.०६.०९.२०२० पर्यत मुदतवाढ देण्यात आली होती. प्रतिनियुक्तीचा कालावधी दि.०७.०९.२०२० रोजी संपुष्टात आल्यामुळे दि.१८.११.२०२० रोजीच्या आदेशान्वये, सदर आदेशाच्या दिनांकापर्यंत मुदतवाढ देण्यात येऊन, त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या पदावरील सेवा दि.१८.११.२०२० रोजीच्या आदेशाच्या दिनांकापासून प्रत्यावर्तीत करण्यात आल्या व त्यांची प्रत्यावर्तनानंतरची पदस्थापना सामान्य प्रशासन विभागातील अवर सचिवाच्या रिक्त पदावर करण्यात आली होती.

२. आता, श्रीमती पाटील यांच्या पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, आकुर्डी, जि.पुणे या कार्यालयातील “उप मुख्य कार्यकारी अधिकारी” पदावरील प्रतिनियुक्तीस दि.०७.०९.२०२० ते दि.०२.०१.२०२२ पर्यंत **एक विशेष बाब** म्हणून मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. तसेच या आदेशान्वये श्रीमती आशाराणी उ.पाटील, अवर सचिव यांच्या प्रतिनियुक्तीच्या पदावरील सेवा प्रत्यावर्तीत करण्यात येत असून, त्यांची प्रत्यावर्तनानंतरची पदस्थापना **अल्पसंख्यांक विकास विभागातील अवर सचिवाच्या रिक्त पदावर** करण्यात येत आहे. श्रीमती आशाराणी उ.पाटील, अवर सचिव यांना पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, आकुर्डी, जि.पुणे येथून दि.०३.०१.२०२२ (म.पू.) पासून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. श्रीमती पाटील यांनी कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता, अल्पसंख्यांक विकास विभागात तात्काळ रुजू व्हावे.

४. **सदरचे आदेश हेच कार्यमुक्ततेचे आदेश असून, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, आकुर्डी, जि.पुणे कार्यालयाने स्वतंत्र आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता नाही.**

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२९१२११३८८७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2021.12.29 12:12:04 +05'30'

**( ग. भि. गुरव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.

२. अ.मु.स.(सेवा),सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई.
३. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
४. अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, नगर विकास विभाग/अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, आकुर्डी, जि.पुणे.
६. सह/उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग/नगर विकास विभाग/अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सह/उप सचिव (कार्या.२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. श्रीमती आशाराणी उ.पाटील, अवर सचिव तथा उप मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, आकुर्डी, जि.पुणे.
९. निवडनस्ती कार्यासन-१४.